**बंद्यांचे सामाजिक व आर्थिक पुनर्वसन करण्याच्या दृष्टीने कारागृह विभाग व सेवाभावी संस्थेच्या संयुक्त विद्यमाने कारागृह उद्योग - उत्पादन वाढविणे बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-एमएजे-०१२१/८/प्र.क्र.१३० ब/पीआरएस-२.**
**मंत्रालय,मुंबई-४०० ०३२. दिनांक :- २६ जून, २००३.**

**वाचा:- १) शासन पत्र,गृह विभाग,क्रमांक-एमएजे-०१२१/८/प्र.क्र.१३०/पीआरएस-२ दिनांक ६ नोव्हेंबर,२००१.**
**२) शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र. भाखंस-२००२/(२९७५)/ उद्योग-६, दिनांक ७ मार्च २००२.**
**३) शासन अधिसूचना,गृह विभाग,क्रमांक-एमएजे-०१२१/प्र.क्र.१३०/खुका./पीआरएस-२, दिनांक ८.३.२००२.**
**४) क्रिमिनल रिट पिटीशन क्रमांक.१७६/२००२ बंदी छोटेखाँ पठाण विरुध्द महाराष्ट्र शासन या याचिकेप्रकरणी मुंबई उच्च न्यायालय,खंडपीठ नागपूर यांनी दिनांक १७.२.२००२ रोजी दिलेले आदेश.**

<u>प्रस्तावना :-</u> सिध्दापराध बंद्यांना कारावासाच्या कालावधीत निरनिराळया उद्योगधंद्यांचे प्रशिक्षण दिले जात असून बंद्यांनी उत्पादित केलेल्या वस्तूंना बाजारपेठ मिळावी या हेतूने शासनाने आतापर्यंत कारागृह विभागासाठी एकूण ७० वस्तूंचे आरक्षण दिलेले आहे. सदर वस्तू सर्व शासकीय/ निमशासकीय इत्यादी संस्थांनी कारागृहाकडून खरेदी करणे बंधनकारक केलेले आहे. असे असले तरी उपरोक्त संस्थांकडून पुरेशा मागण्यां अभावी कारागृह निर्मित वस्तू सांठून राहणे,कारागृह उद्योग ठप्प होणे.बंद्यांना काम व रोजगार न मिळणे, परिणामी कैद्यांच्या न्यायालयीन तक्रारी वाढणे व शासनाच्या उत्पन्नात घट होणे इ.बाबींना कारागृह विभागास तोंड द्यावे लागत आहे. या संदर्भात सन्मा.मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर यांनी शिक्षा भोगणा-या बंद्यांना रोजगार उपलब्ध करुन देणे ही राज्य शासनाची जबाबदारी असल्याने त्याबाबतीत तातडीने कार्यवाही करण्याचे निर्देश दिलेले आहेत. त्या अनुषंगाने कारागृहातील बंद्यांना व्यावसायिक प्रशिक्षण व रोजगार देऊन राज्याचे महसूली उत्पन्न वाढविणे तसेच मुक्ततेनंतर बंद्यांचे आर्थिक व सामाजिक पुनर्वसन करणे या उद्दिष्टपूर्तीकरिता कारागृह विभाग व महाराष्ट्र सामाजिक कल्याण सेवाभावी संस्था, औरंगाबाद यांच्या सहकार्याने औरंगाबाद खुले कारागृह येथे प्रायोगिक तत्वावर उत्पादन कार्य सुरु करण्याच्या योजनेस मान्यता देण्यात आलेली होती. ती पुढे चालू ठेवणे व या योजनेचा विस्तार इतर कारागृहांमध्ये करुन ती राबविणे आणि सेवाभावी संस्थांचा सहभाग वाढविणे याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**कारागृहातील बंद्यांना विविध उद्योगांच्या प्रशिक्षणाद्वारे रोजगार उपलब्ध करणे. व त्याद्वारे राज्याचे महसूल उत्पन्न वाढविणे आणि बंदीजनांचे मुक्ततेनंतर सामाजिक पुनर्वसन करणे याकरिता कारागृह विभाग व महाराष्ट्र सामाजिक कल्याण सेवाभावी संस्था,औरंगाबाद यांच्या संयुक्त विद्यमाने कारागृहासाठी आरक्षित असलेल्या वस्तुंचे उत्पादन करण्यासाठी प्रायोगिक तत्वावर देण्यात आलेली परवानगी पुढे चालू ठेवून सेवाभावी संस्थांचा सहभाग वाढविण्याकरीता या योजनेचा विस्तार इतर कारागृहांमध्ये देखिलकरण्यास खालीलअटीच्या व शर्तीच्या अधीन राहून शासन मान्यता देत आहे :-

**योजनेचे स्वरुप :-** कारागृह विभाग, सेवाभावी संस्थांच्या संयुक्त विद्यमाने कारागृह आरक्षित वस्तूंची निर्मिती राज्यातील कारागृहांमध्ये तसेच कारागृह परिसरात वसलेल्या मुक्त बंदीजन उत्पादन केंद्रात करेल. या योजनेअंतर्गत उत्पादन कार्यासाठी सध्या अस्तित्वात असलेल्या पायाभूत सुविधा कारागृह विभाग उपलब्ध करुन देईल. कारागृह कारखान्यांची एकूण रोजगार व उत्पादन क्षमता विचारात घेवून सर्व बंदयांना नियमितपणे रोजगार उपलब्ध करुन देण्याच्या दृष्टीने कारागृह विभागाच्या वतीने शासकीय/ निमशासकीय संस्थांकडून मागण्या प्राप्त करुन घेण्याची जबाबदारी सेवाभावी संस्थेची राहील. तसेच उत्पादन कार्यासाठी कारागृह विभागाकडे उपलब्ध असलेल्या यंत्रसामुग्री व्यतिरिक्त इतर आवश्यक यंत्रसामुग्री संस्थेस स्वखर्चाने कारागृहाच्या उत्पादन केंद्रात उभारावी लागेल. मोफत प्रशिक्षण देऊन रोजगार उपलब्ध करुन दिलेल्या बंदयाना प्रचलित किमान वेतन कायदयातंर्गत असलेल्या तरतूदीनुसार मजूरी देणे संस्थेवर बंधनकारक राहील. तथापि बंद्यांना कारागृह विभागाकडून कारागृह नियमावलीनुसार मजुरी/ वेतन देण्यात येईल व संस्थेने दिलेली मजुरी आणि बंद्यांना प्रत्यक्षात मिळणारी मजुरी यातील फरकाची रक्कम, कारागृह उद्योग उत्पादन कार्यासाठी महसुलाच्या रुपात शासनास जमा करण्यात येईल. या उत्पादन कार्यासाठी खरेदीदाराने कळविलेल्या विनिर्देशांनुसार वस्तुंची निर्मिती करण्याकरिता लागणा-या कच्च्या मालाची खरेदी सेवाभावी संस्था स्वखर्चाने कारागृह विभागाने कळविलेल्या विनिर्देशांनुसार करील व याची पूर्ण जबाबदारी संस्थेची राहील. ही योजना राबविण्यासाठी लागणारा निधी विभागाच्या २०५६ तुरुंग, या लेखाशिर्षाखाली मंजूर केलेल्या वार्षिक अनुदानातून तसेच स्वीय प्रपंजी खात्यातील शिल्लक रकमेतुन करण्यांत येईल.

**योजनेच्या अटी व शर्ती** :-

१. कारागृह व परिसरात कारागृह विभाग व सेवाभावी संस्था यांच्या संयुक्त विद्यमाने उत्पादन कार्य विषयक योजना राबविण्यासाठी सेवाभावी संस्थेची नोंदणी ही प्रचलित नोंदणी कायदयानुसार झालेली असावी तसेच सेवाभावी संस्थेची निवड करण्याकरीता या शासन निर्णयासोबत जोडलेले सहपत्र 'अ' मधील निकषांनुसार कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे हे संस्थेच्या पात्रते विषयी पडताळणी करुन व अशा निकषांची पुर्तता करणा-या संस्थांची अंतीम निवड करण्या बाबत शासनास शिफारस करतील.

२. कारागृह विभाग व सेवाभावी संस्था यांच्या संयुक्त विद्यमाने राज्यातील कारागृहांमध्ये तसेच कारागृह परिसरात वसलेल्या मुक्तबंदीजन उत्पादन केंद्रात उत्पादन कार्य करण्यांत येईल.

३. या योजनेअंतर्गत उत्पादन कार्यात एकापेक्षा जास्त सेवाभावी संस्थांना सहभागी केल्यास एकाच प्रकारच्या वस्तूंची मोठया प्रमाणावरील मागणी पूर्ण करण्यांची जबाबदारी एकाच संस्थेवर सोपविण्यांत

येईल. तयार वस्तूंचा दर्जा एक सारखा राखण्यांच्या उद्येशाने अशा मागणीची विभागणी इतर संस्थांमध्ये करण्यांत येणार नाही.

४. कारागृह परिसरात संयुक्त विद्यमाने होणा-या उत्पादन कार्याबाबत कारागृह विभाग व सेवाभावी संस्था यांच्यात असे उत्पादन प्रत्यक्षात सुरु होण्यापूर्वी शासनाचे आर्थीक हित विचारात घेऊन अटी व शर्तीचा समावेश असलेला संयुक्त करारनामा करण्यांत यावा व त्या नुसारच उत्पादन कार्य राबविण्यांत येईल.

५. शासनाच्या उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने कारागृह विभागास वेळोवेळी आरक्षित केलेल्या वस्तू तसेच कारागृह विभागाकडे खरेदी दारांनी अन्य वस्तूकरिता मागण्या नोंदविल्यास व सेवाभावी संस्थेस अशा वस्तूंच्या निर्मिती कार्यात सहभागी करुन घेतल्यास त्याबाबत देखील बंद्याना मोफत प्रशिक्षण देण्याची जबाबदारी संस्थेची राहील.

६. उत्पादन कार्यासाठी अस्तित्वात असलेल्या पायाभूत सुविधा संस्थेस उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी कारागृह विभागाची राहील. यंत्रसामुग्रीच्या परिरक्षण व दुरुस्ती यावरील प्रत्यक्ष खर्च कारागृह विभागाने ठरवून दिलेल्या दरानुसार संस्थेस दयावा लागेल. तसेच संस्थेने कारागृह विभागाच्या वतीने मिळविलेल्या मोठ्या प्रमाणावरील मागण्या विहीत मुदतीत पूर्ण करण्यासाठी अतिरिक्त यंत्रसामुग्रीची गरज भासल्यास आवश्यक यंत्रसामुग्री संस्थेस कारागृह परिसरात स्वखर्चाने उभारावी लागेल. व या यंत्र सामुग्रीच्या परिरक्षणाची व दुरुस्तीची जबाबदारी संस्थेची राहील.

७. संयुक्त विद्यमाने होणा-या उत्पादन कार्यासाठी खरेदी केलेल्या कच्च्या मालावर प्रचलित दराने विमा खर्च व उत्पादनासाठी वापरलेल्या विजेचा प्रत्यक्ष खर्च देण्याची जबाबदारी संस्थेवर राहील.

८. कारागृह कारखान्यांची एकूण रोजगार व उत्पादन क्षमता विचारात घेवून सर्व पात्र बंदयांना नियमितपणे रोजगार उपलब्ध करुन देण्याच्या दृष्टीने कारागृह विभागाच्या वतीने पुरेशा मागण्या प्राप्त करुन घेण्याची जबाबदारी सेवाभावी संस्थेची राहील व सेवाभावी संस्थेने कार्यान्वयनासाठी मागण्यांबाबतची माहिती वेळोवेळी कारागृह महानिरीक्षक,पुणे व संबंधित कारागृहाच्या अधिक्षकांना देईल.

९. उत्पादन कार्यासाठी खरेदीदाराने कळविलेल्या विर्निदेशांनुसार वस्तुंची निर्मिती करण्याकरिता लागणा-या कच्च्या मालाची खरेदी कारागृह विभागाने कळविलेल्या विर्निदेशां नुसार करण्याची जबाबदारी संस्थेची राहील.

१०. या योजनेअंतर्गत संस्थेमार्फत बंद्यांना देण्यात येणारी मजुरी प्रचलित किमान वेतन कायद्यांतर्गत असलेल्या तरतुदीनुसार देणे संस्थेवर बंधनकारक राहील. तथापि बंद्यांना कारागृह नियमावलीनुसार मजुरी/वेतन देण्यात येईल व संस्थेने दिलेली मजुरी आणि बंद्यांना प्रत्यक्षात मिळणारी मजुरी यातील फरकाची रक्कम कारागृह उद्योग उत्पादन कार्यासाठी स्वीय प्रपंजी खात्यात जमा करण्यात येऊन त्यामधून उत्पादन कार्यासाठी तो खर्च करण्यात येईल व याबाबतच्या झालेल्या खर्चाची दर दोन महिन्यांची एकत्रित तपशीलवार माहिती संस्थेकडून घेऊन ती कारागृह विभागामार्फत संबंधित कोषागार कार्यालय,गृह(तुरुंग) विभाग यांना कळविण्यात येईल.

११. या योजने अंतर्गत उत्पादीत केलेल्या वस्तूंच्या किंमती निश्चित करण्यासाठी कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी गठित केलेल्या समिती मार्फत करण्यांत येतील व या समितीमध्ये सेवाभावी संस्थेच्या एका प्रतिनिधीचा समावेश राहील.

१२. सेवाभावी संस्थेने कारागृह विभागाच्या वतीने प्राप्त केलेल्या मागण्यांप्रमाणे वस्तूंचे उत्पादन कारागृह परिसरात करुन त्याचा पुरवठा संस्था कारागृह विभागाच्या वतीने खरेदीदारांना वहातुकीवरील खर्चासह करील.

१३. या योजनेतंर्गत वस्तूंच्या मागण्या पूर्ण करण्यासाठी लागणारा उत्पादन खर्च विभागाच्या २०५६ तुरुंग या लेखा शिर्षाखाली मंजूर केलेल्या वार्षीक अनुदानातुन तसेच संबंधीत कारागृहाच्या नांवे असलेल्या स्वीय प्रपंजी खात्यातील शिल्लक रक्कमेतून करण्यांत येईल.

१४. संस्थेने कारागृह विभागाच्या वतीने प्राप्त केलेल्या मागण्या अथवा कारागृह विभागाने संस्थेकडे संयुक्त विद्यमाने उत्पादन करण्यासाठी वर्ग केलेल्या मागण्या पूर्ण करण्याकरीता लागणारा कच्चा / पक्का माल व इतर सामुग्री पुरवठा करुन त्या बाबतचे देयक संबंधीत कारागृहास अदा करण्यास दिल्यास अशा देयकातील एकूण रक्कमेपैकी फक्त ८०% एवढी रक्कम संस्थेस धनाकर्ष/ धनादेशाव्दारे त्वरीत देण्यांत येईल व मागणी प्रमाणे तयार वस्तूंचा पुरवठा केल्या नंतर अशा वस्तूंच्या निर्मिती बाबत झालेल्या संयुक्त करारनाम्यातील अटी नुसार कारागृहास देय होणा-या रक्कमांची वजावाट ( कारागृह नफ्यासह ) करुन उर्वरित रक्कम संस्थेस अदा करण्यांत येईल.

१५. प्राप्त झालेल्या मागणी नुसार तयार वस्तूंचा पुरवठा संबंधीतांना करताना विक्रिकराची रक्कम कारागृहाच्या देयकात वेगळी दर्शविण्यांत येत असून या रक्कमेचा भरणा विक्रिकर विभागाकडे तात्काळ भरण्याची जबाबदारी संस्थेवर राहील व तसे केल्याचा पुरावा म्हणून चलनाची एक प्रत संबंधीत कारागृह अधीक्षकांकडे सादर करावी. याबाबत विक्रीकर कार्यालय/विभाग यांचेकडून कोणतीही तक्रार आल्यास त्या संदर्भात दंडात्मक रक्कम भरण्याची जबाबदारी संस्थेची राहील.

१६. या योजनेच्या उत्पादन कार्याबाबत करण्यांत येणा-या करारनाम्यात पुढील बाबींचा समावेश करण्यांत यावा.

अ) सेवाभावी संस्थेने उभारणी केलेली यंत्र सामुग्री त्याच्या किंमती बाबतच्या प्रमाणपत्रासहीत (खरेदी व घसारा किंमतीचे चार्टड इंजिनिअर यांचे प्रमाणपत्र) संबंधीत कारागृह अधीक्षकांकडे तारण म्हणून ठेवावी लागेल व तसे तारणपत्र संस्थेस दयावे लागेल.

ब) सेवाभावी संस्थेने अनामत रक्कम/ सुरक्षा ठेव म्हणून रु. २.०० कोटीचे ( रुपये दोन कोटी फक्त) ) धनादेश कारागृह महानिरीक्षणालयाकडे जमा करावेत.

१७. कारागृह विभाग व सेवाभावी संस्था यांच्यात झालेल्या संयुक्त करारनाम्यातील अटी नुसार करारनाम्याची मुदत संपुष्टात येईल अथवा मुदतपूर्व करारनामा रद्द होईल तेव्हा संस्थेने तारण म्हणूण ठेवलेली यंत्र सामुग्री व अनामत रक्कम/ सुरक्षा ठेव संस्थेस परत करण्यांत येईल. तथापि संस्थेकडे कारागृह विभागाची थकबाकी निघाल्यास अशी रक्कम सुरक्षा ठेव / अनामत रक्कमेतून किंवा यंत्रसामुग्रीतुन वसूल करण्यांत येईल.

१८. मागण्यानुसार होणारे उत्पादन व तयार वस्तू तसेच प्रत्येक बंद्यांनी तयार केलेल्या वस्तू इत्यादी बाबतच्या नोंदी संबंधीत कारागृह अधीक्षकांनी निदेशित केलेल्या नोंदवहयामध्ये संयुक्तपणे कराव्यात.

त्यासाठी लागणा-या कर्मचा-यांची नेमणूक करण्याची जबाबदारी व त्यांचे वेतन व भत्ते देण्याची जबाबदारी संस्थेची राहील. तसेच विपणन, प्रशिक्षण व उत्पादन आणि बंदीपुनर्वसन इत्यादी कार्यासाठी संस्थेने नेमणूक केलेल्या कर्मचा-यांचे वेतन व भत्ते देण्याची जबाबदारी संस्थेची राहील त्या बाबत शासन कोणताही आर्थीक भार सोसणार नाही.

वरील अटी व शर्तींच्या अधिन राहून कारागृह विभाग व सेवाभावी संस्थेच्या संयुक्त सहकार्याने कारागृह उद्योग सुरु करणेबाबत या पूर्वी प्रायोगिक तत्वावर देण्यांत आलेली मान्यता चालू ठेवण्यांत येत आहे. वरील योजनेचा विस्तार करुन वर उल्लेख केलेल्या अटी व शर्तीप्रमाणे राज्यातील कारागृहांमध्ये पात्र सेवाभावी संस्थांच्या सहभागाने कारागृह उद्योग वाढवून बंद्यांचे सामाजिक व आर्थिक पुनर्वसन करण्यास शासन मान्यता देत आहे. मात्र प्रत्येक कारागृहासाठी स्वीय प्रपंजी लेखा उघडण्यासाठी वित्त विभागाची पूर्वमान्यता घेणे बंधनकारक राहील.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या मान्यतेने व त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक-सीआर-६४१/व्यय-८, दिनांक ५.६.२००३ व प्र.क्र.६१९/अर्थ-१०,दिनांक १०.६.२००३ अन्वये निर्गमित करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( र.ना.माळी )
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन,गृह विभाग.

प्रति,
मा.राज्यपाल यांचे सचिव.
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव.
मा.उपमुख्यमंत्री यांचे उप सचिव.
सर्व मंत्री महोदयांचे खाजगी सचिव.
मा.राज्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव.
मा.मुख्य सचिव.
अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (गृह/तुरुंग/वित्त/उद्योग)
कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक( मुख्यालय, पुणे/ मुंबई/पुणे/औरंगाबाद/नागपूर).
महालेखापाल,महाराष्ट्र-१/२(लेखा व अनुज्ञेयता) ,मुंबई/नागपूर
महालेखापाल,महाराष्ट्र-१/२(लेखा परिक्षा) ,मुंबई/नागपूर.
सर्व कारागृह अधिक्षक.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई व सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
अवर सचिव,कार्यासन बीयुडी-१,गृह विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
कक्ष अधिकारी (व्यय-८)/ अर्थ-१०, वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
निवडनस्ती

## सहपत्र - अ

## सेवाभावी संस्थेच्या पात्रतेविषयीक निकष.

१. सेवाभावी संस्थेची नोंदणी प्रचलित नोंदणी कायदया नुसार झालेली असावी.

२. संस्थेच्या संस्थापन नियमावली ( by law's) मध्ये बंदीजनाचे कल्याण व सामाजिक आणि आर्थीक पुर्नवसन करण्याच्या बाबीचा प्रामुख्याने अंर्तभाव असावा.

३. संस्थेस उद्योग धंदयातील व्यवस्थापन कार्याचा व बंदीपुनर्वसन कार्याचा अनुभव असणे आवश्यक आहे.

४. बंद्याना तांत्रीक प्रशिक्षण देण्यासाठी अनुभवी तांत्रीक कर्मचारी वर्ग उपलबध करुन देण्याची संस्थेची क्षमता असावी.

५. संस्थेने संयुक्तविद्यमाने उत्पादन व बंद्याचे पुर्नवसन कार्य राबविताना आर्थीक लाभाचा हेतु संस्थेने बाळगू नये व " ना नफा ना तोटा " या तत्वावर कार्य करण्याची संस्थेची तयारी असावी.

६. संस्थेकडे स्वतःचे किमान २ कोटी रुपयांचे भाग भांडवल असणे आवश्यक राहील आणि सदर रक्कमेचा धनादेश कारागृहाला सुरक्षा ठेव म्हणून जमा करावा लागेल.

७. कच्चा माल, तंत्रज्ञान, पक्क्या मालाचे विपणन इत्यादी बाबींचा अनुभव संस्थेच्या अध्यक्ष, उपाध्यक्ष, सचिव, संचालकांना असणे आवश्यक राहील.

८. संचालक मंडळातील पदाधिकारी स्वच्छ चारित्र्याचे, व समाजातील प्रतिष्ठीत नागरी असावेत, तथापि कोणत्याही पदाधिका-यास फौजदारी खटल्यात शिक्षा झालेली नसावी अथवा फौजदारी खटला न्यायालयात प्रलंबीत नसावा.

९. संस्थेकडे आयकर व विक्रिकराची थकबाकी नसावी व तशी प्रमाणपत्रे दरवर्षी सादर करणे संस्थेवर बंधनकारक राहील.

-----

एच-358(500-6-03)3अ.